पिंपरी चिंचवड वाहतूक शाखेकरिता
आधुनिक टोईंग प्रकल्पास मान्यता देणेबाबत....

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

### शासन निर्णय क्रमांक: टीआरए २०२०/प्र.क्र.२२८/पोल-८

२ रा मजला, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०४ जुलै, २०२४

वाचा :-

१. विशेष पोलीस महानिरीक्षक (प्रशासन), पोलीस महासंचालक कार्यालय यांचे पत्र क्र.पोमंस/१९-अ/३२/वाहने/टोईंग प्रकल्प(पिंपरी चिंचवड)/४०/२०२३, दि.१६.०४.२०२४

२. पोलीस आयुक्त, पिंपरी चिंचवड यांचे पत्र क्र.पोउआ/वाहतूक/टोईंग/ /२०२४, दि.०५.०४.२०२४

३. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दि.०१.१२.२०१६

४. शासन निर्णय, गृह विभाग क्र.पीईक्यू-०११६/प्र.क्र.३३१/पोल-४,दि.३१.०७.२०१९

५. उच्चस्तरीय खरेदी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त, दि.१९.०६.२०२४

**प्रस्तावना :-**

पिंपरी चिंचवड पोलीस आयुक्तालयाच्या कार्यकक्षेतील पिंपरी चिंचवड महानगरपालिका हे सर्वात मोठा व अति महत्त्वाचा भाग आहे. शहरांतर्गत मोठ्या बाजारपेठा असून हिंजवडी येथे देशातील महत्त्वाचे आयटी पार्क, तसेच महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या चाकण, तळेगाव दाभाडे, देहूरोड, भोसरी येथे औद्योगिक वसाहती आहेत. त्यामुळे येथील लोकसंख्या व दुचाकी, चारचाकी व बसेस, इत्यादी वाहनांच्या प्रमाणात मोठी वाढ झाली असून औद्योगिक वसाहतीत येणा-या जाणा-या जड-अवजड वाहनांमुळे सदर परिसरामध्ये नेहमीच वाहतूक कोंडी होत असते.

यापूर्वी पिंपरी चिंचवड आयुक्तालयामध्ये वाहनांचे टोईंग करण्याकरिता पिंपरी चिंचवड महानगरपालिकेद्वारे नियुक्त केलेल्या टोईंग ऑपरेटरची सेवा विनंतीवरून प्राप्त करून घेण्यात आली होती. तथापि पिंपरी चिंचवड महानगरपालिका व टोईंग ऑपरेटर यांच्यातील करार संपुष्टात आल्याने माहे जून, २०२३ पासून पिंपरी चिंचवड वाहतूक शाखेची टोईंग व्हॅन व्यवस्था बंद आहे. त्यामुळे पिंपरी चिंचवड आयुक्तालयास वाहतुकीचे उल्लंघन आणि वाहतुकीस अडथळे करणा-या वाहनांवर कारवाई करण्यास अडचणी निर्माण होत असल्याने, पिंपरी चिंचवड पोलीस आयुक्तालयामध्ये डिझाईन, बिल्ड, ऑपरेट आणि मेंन्टेन (DBOM) च्या आधारावर आधुनिक टोईंग व्हॅन प्रकल्प कार्यान्वित करण्यासाठी प्रशासकीय मान्यता मिळणे तसेच यशस्वी निविदाकार मे. विदर्भ इन्फोटेक प्राइव्हेट लिमिटेड, नागपूर यांना कार्यादेश देण्याबाबत शासन मान्यता मिळणेबाबत पोलीस आयुक्त, पिंपरी चिंचवड यांनी संदर्भ क्र.२ अन्वये प्रस्ताव सादर केला आहे. सदर प्रस्तावास पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांनी संदर्भ क्र.१ अन्वये सहमती दर्शविली आहे. त्यानुसार पोलीस आयुक्त, पिंपरी चिंचवड यांच्या संदर्भ क्र.२ येथील प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :</u>**

संदर्भ क्र.३ अन्वये अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग यांच्या अध्यक्षतेखाली गठित करण्यात आलेल्या उच्चस्तरीय खरेदी समितीने दिलेल्या मान्यतेनुसार तसेच पोलीस आयुक्त, पिंपरी चिंचवड यांनी संदर्भ क्र.२ अन्वये सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरून, पिंपरी चिंचवड पोलीस आयुक्तालयामध्ये डिझाईन, बिल्ड, ऑपरेट आणि मेंन्टेन (DBOM) च्या आधारावर आधुनिक टोईंग व्हॅन प्रकल्प कार्यान्वित करण्यासाठी याद्वरे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. तसेच निविदा प्रक्रियेअंती यशस्वी निविदाकार मे. विदर्भ इन्फोटेक प्राइव्हेट लिमिटेड, नागपूर यांना कार्यारंभ आदेश देण्यास उपरोक्त नमूद उच्चस्तरीय समितीने मान्यता दिली असल्याने पोलीस आयुक्त, पिंपरी चिंचवड यांनी संदर्भ क्र.५ येथील इतिवृत्तात नमूद केलेल्या उच्चस्तरीय समितीच्या निर्णयांच्या अनुषंगाने त्याबाबत **नियमानुसार** पुढील आवश्यक कार्यवाही करावी.

३. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०७०४१७२२५३६०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

CHHAYA NATHU MALI

Digitally signed by CHHAYA NATHU MALI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=cd4e9f6041c76a9f3fd5cbcbc45affce68bbd6f32230f05b4a2b54b875937776, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B20C807A33573110F6D8441C862B04F58811935279DCAD666C42A2FABC6C24E8, cn=CHHAYA NATHU MALI
Date: 2024.07.04 17:35:55 +05'30'

**( छाया न. माळी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. पोलीस आयुक्त, पिंपरी चिंचवड.
५. पोलीस उपायुक्त (वाहतूक), पिंपरी चिंचवड.
६. निवडनस्ती (पोल-८), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.